महाराष्ट्र स्थापत्य अभियांत्रिकी परीक्षा-२०१९ व परीक्षा-२०२१ मधील शिफारस प्राप्त उपविभागीय जलसंधारण अधिकारी (स्थापत्य) गट-अ या संवर्गातील उमेदवारांच्या परिवीक्षाधीन प्रशिक्षण कालावधीकरीता अधिसंख्य पदांना मुदतवाढ देणेबाबत....

**महाराष्ट्र शासन**
**मृद व जलसंधारण विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक : आस्थाप-२०२३/ प्र.क्र.३६५/जल-२**
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक : ३ मे, २०२४

**संदर्भ :-**

१) मृद व जलसंधारण विभाग, शासन आदेश क्र.आस्थाप-२०२३/प्र.क्र.३६४/जल-२, दि.०५/१२/२०२३
२) मृद व जलसंधारण विभाग, शासन आदेश क्र.आस्थाप-२०२२/प्र.क्र.२७३/जल-२, दि.२९/१२/२०२३
३) शासन निर्णय, वित्त विभाग क्रमांक पदनि २०१६/प्र.क्र.७/१६/वित्तीय सुधारणा-१, दि.२०/०२/२०१६
४) शासन निर्णय, वित्त विभाग क्रमांक पदनि २०१६/प्र.क्र.७/१६/आ.पु.क., दि.२७/०१/२०१७
५) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग क्र. परिवी-२७१५/प्र.क्र.३०२/कार्या ८, दि.२२.०६.२०२१
६) मृद व जलसंधारण विभागाचा समक्रमांकाचा शासन निर्णय दि.१४.०२.२०२४
७) मृद व जलसंधारण विभागाचा शासन निर्णय क्र. आस्थाप-२०२४/प्र.क्र.६९/ जल-२, दि.२९.०२.२०२४
८) अतिरीक्त महासंचालक, यशदा पुणे यांचे क्र. पायाभूत-मृद व जलसंधारण/०१/ २०२३-२४, दि.१२.०३.२०४ चे पत्र
९) मृद व जलसंधारण विभागाचा समक्रमांकाचा शासन निर्णय दि.२२.०३.२०२४
१०) मृद व जलसंधारण विभागाचे पत्र क्र. आस्थाप-२०२२/प्र.क्र.२७३/जल-२, दि.१६.०४.२०२४

**प्रस्तावना :-**

महाराष्ट्र (स्थापत्य) अभियांत्रिकी सेवा परीक्षा-२०१९ व २०२१ मधील, सरळसेवा शिफारस प्राप्त "उपविभागीय जलसंधारण अधिकारी (स्थापत्य) गट-अ व अन्य समकक्ष पदे" या संवर्गातील उमेदवारांना संदर्भ क्र.१ व २ अन्वये दोन वर्षांचा परिवीक्षाधीन काळ समाधानकारकरित्या पूर्ण करण्याच्या अधीन राहून तात्पुरती नियुक्ती देण्यात आली आहे. तसेच दि.०१.०१.२०२४ रोजी आयुक्त, मृद व जलसंधारण, छ.संभाजीनगर येथे हजर करून घेऊन १२ आठवड्यांच्या तांत्रीक प्रशिक्षणासाठी वाल्मी, छ.संभाजीनगर येथे पाठविण्यात आले आहे.

तसेच प्रशिक्षणासाठी प्रत्यक्ष रुजू झालेल्या उमेदवारांचे परिवीक्षाधीन प्रशिक्षण कालावधीतील वेतन व भत्ते आयुक्तालयातून अदा करणे शक्य व्हावे याकरिता आयुक्त, मृद व जलसंधारण, छ.संभाजीनगर या कार्यालयाच्या आस्थापनेवर संदर्भ क्र.६ अन्वये, दि.०१.०१.२०२४ ते दि.१९.०३.२०२४ या कालावधीकरीता १४ अधिसंख्य पदे निर्माण करण्यात आलेली आहेत.

उपरोक्त १४ उमेदवारांपैकी श्री. दिनेश आसाराम शेळके यांची यांची जलसंपदा विभागामध्ये सहायक अभियंता श्रेणी-१ म्हणून सरळसेवेने नियुक्ती झालेली असल्यामुळे त्यांना या विभागातून दि.२९.०२.२०२४ रोजी कार्यमुक्त करण्यात आलेले आहे. आता उर्वरित १३ उमेदवारांचे वाल्मी, छत्रपती संभाजीनगर अंतर्गत प्रशिक्षण कार्यक्रम दि.१९.०४.२०२४ ते दि.२७.०५.२०२४ या कालावधीपर्यंत वाढविण्याचा शासनाने निर्णय घेतला आहे. त्यानुसार दि.१९.०४.२०२४ ते दि.२७.०५.२०२४ या कालावधीमध्ये प्रशिक्षण आयोजित करण्यात आलेले आहे. सदर प्रशिक्षण कालावधीतील परिवीक्षाधीन उमेदवारांचे वेतन व भत्ते आयुक्तालयातून अदा करणे शक्य व्हावे याकरिता आयुक्त, मृद व जलसंधारण, छ.संभाजीनगर या कार्यालयाच्या आस्थापनेवर १३ अधिसंख्य पदांना दि.२७.०५.२०२४ पर्यंत मुदतवाढ देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

महाराष्ट्र लोकसेवा आयोगाकडून महाराष्ट्र अभियांत्रिकी परीक्षा-२०१९ व परीक्षा-२०२१ च्या अंतिम निकालाच्या आधारे निवड झालेल्या व प्रशिक्षणासाठी रूजू झालेल्या उपविभागीय जलसंधारण अधिकारी (स्थापत्य) गट-अ व अन्य समकक्ष पदे या संवर्गातील सोबतच्या विवरणपत्रातील १३ उमेदवारांकरिता सुधारित वेतन मॅट्रीक्समधील वेतनस्तर एस-२० (रू.५६१००-१७७५००/-) मध्ये एकुण १३ अधिसंख्य पदांना सोबत जोडलेल्या विवरणपत्रानुसार दि. १९.०४.२०२४ ते दि.२७.०५.२०२४ या कालावधीसाठी मुदतवाढ देण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

२. सदर १३ अधिसंख्य पदे आयुक्त, मृद व जलसंधारण, छ.संभाजीनगर यांच्या कार्यालयातील आस्थापनेवर निर्माण करण्यात येत आहेत.

३. सदर १३ अधिसंख्य पदांना दि.२७.०५.२०२४ च्या पुढे मुदतवाढ न दिल्यास, सदर पदे दि.२८.०५.२०२४ रोजी आपोआप संपुष्टात येतील.

४. उपविभागीय जलसंधारण अधिकारी (स्थापत्य) गट-अ व अन्य समकक्ष पदे या संवर्गातील सदर १३ अधिसंख्य पदांच्या दि.१९.०४.२०२४ ते दि.२७.०५.२०२४ या कालावधीतील वेतनावर येणारा खर्च या विभागाच्या २४०२ - मृद व जलसंधारण, ००, ००१, संचालन व प्रशासन (०१) सर्वसाधारण आस्थापना (०१) (०१) आयुक्त, मृद व जलसंधारण, छ.संभाजीनगर यांची आस्थापना (अनिवार्य) ०१, वेतन (२४०२ ए११२) या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा.

५. सदर परिवीक्षाधीन प्रशिक्षणार्थी उमेदवारांच्या वेतनासाठी आयुक्त, मृद व जलसंधारण, छ.संभाजीनगर हे नियंत्रण अधिकारी व त्याच कार्यालयातील उपायुक्त वित्त हे आहरण व संवितरण अधिकारी राहतील. प्रशिक्षणासाठी वाल्मी, छ.संभाजीनगर येथे प्रत्यक्ष रूजू झालेल्या परिविक्षाधीन उपविभागीय जलसंधारण अधिकारी यांना ते ज्या दिनांकापासून रूजू झालेले आहेत त्या दिनांकापासून नियमित वेतन प्रदान करण्यात यावे.

६. हा शासन निर्णय, वित्त विभाग, शासन निर्णय क्र.पदनि-२०१६/प्र.क्र.७/१६/वित्तीय सुधारणा-१, दिनांक २०/०२/२०१६ व वित्त विभाग, शासन निर्णय क्र. पदनि २०१६/प्र.क्र.७/ १६/आ.पु.क., दि.२७/०१/२०१७ मधील तरतुदीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०२४०५०३११५११३२०२६ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

YUVRAJ BAYAJI AJETRAO

Digitally signed by YUVRAJ BAYAJI AJETRAO
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HOME DEPARTMENT, 2.5.4.20=a34e563dd43e83b04db3eb31230d59c1af4b6e29ee6c1f13e338b0ccd51689af, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=C01C962D08BD39997D4C4D6E7E19F8ACF340D1A5C4DD2B9A00977369607BBF82, cn=YUVRAJ BAYAJI AJETRAO
Date: 2024.05.03 12:06:32 +05'30'

**( यु.ब.अजेटराव )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**सहपत्र- वरीलप्रमाणे**

**प्रत,**

१) सचिव, मृद व जलसंधारण विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
२) महालेखापाल-१/२ लेखापरीक्षा, महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर
३) महालेखापाल-१/२ लेखा व अनुज्ञेयता, महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर
४) आयुक्त, मृद व जलसंधारण विभाग, छ.संभाजीनगर
५) महासंचालक, वाल्मी छ.संभाजीनगर
६) महासंचालक, यशदा, पुणे
७) अपर आयुक्त, जलसंधारण मृद व जलसंधारण प्रादेशिक क्षेत्र, नागपूर/पुणे
८) सर्व प्रादेशिक जलसंधारण अधिकारी, मृद व जलसंधारण विभाग,
९) जिल्हा कोषागार अधिकारी, छ.संभाजीनगर
१०) वित्त विभाग (वित्तिय सुधारणा-१), मंत्रालय, मुंबई
११) निवड नस्ती (जल-२) संग्रहार्थ

**शासन निर्णय क्रमांक : आस्थाप-२०२३/ प्र.क्र.३६५/जल-२, दि.०३/०५/२०२४ सोबतचे विवरणपत्र**

| अ.क्र. | परिवीक्षाधीन उपविभागीय जलसंधारण अधिकारी यांचे नाव | प्रशिक्षणाकरीता रुजू झाल्याचा दिनांक |
|---|---|---|
| १ | श्री. अक्षय अनिल चौधरी | ०१.०१.२०२४ |
| २ | श्रीमती सायली शंकर जाधव | ०३.०१.२०२४ |
| ३ | श्रीमती चेतना बाळासाहेब शिंदे | ०१.०१.२०२४ |
| ४ | श्री.शुभम राजेंद्र चरवंडे | ०१.०१.२०२४ |
| ५ | श्री.तेजस शामसुंदर चिखलीकर | ०१.०१.२०२४ |
| ६ | श्री.बलभिम शिवाजी मोरे | ०१.०२.२०२४ |
| ७ | श्री.विशालकुमार दिगंबरराव सोनटक्के | ०१.०१.२०२४ |
| ८ | श्री.प्रज्वल रेवणनाथ जायभाय | ०१.०१.२०२४ |
| ९ | श्रीमती धनश्री तानाजी मिसाळ | ०१.०१.२०२४ |
| १० | श्रीमती ऋतुजा अरविंद देसाई | ०१.०१.२०२४ |
| ११ | श्री. प्रतिक दत्ता दुम्हारे | ०१.०१.२०२४ |
| १२ | श्री.राजस अरुण कुणकवळेकर | ०१.०१.२०२४ |
| १३ | श्रीमती शुभदा अरुण अष्टुळ | ०१.०१.२०२४ |

YUVRAJ BAYAJI AJETRAO

Digitally signed by YUVRAJ BAYAJI AJETRAO
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HOME DEPARTMENT, 2.5.4.20=a34e563dd43e83b04db3eb31230d59c1af4b6e29ee6c1f13e338b0ccd51689af, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=C01C962D08BD39997D4C4D6E7E19F8ACF340D1A5C4DD2B9A00977369607BBF82, cn=YUVRAJ BAYAJI AJETRAO
Date: 2024.05.03 12:06:53 +05'30'

( यु.ब.अजेटराव )
उप सचिव, महाराष्ट्र शासन